मच्छीमार सहकारी सोसायट्यांना
विक्रीकर सवलतीने पुरविण्यात येणारा
हायस्पीड डिझेलचा कोटा निश्चित करणे
वगैरे बाबींसाठी समितीची नियुक्ती करणे.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक - एमएसटी-१२९७/प्र. क्र. ७४/कराधान-३.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३ ऑक्टोबर, १९९७.

वाचा :- १] शासन पत्र, वित्त विभाग क्रमांक - एमएसटी-१२९५/ प्र. क्र. १०५/कराधान-३, दिनांक २२. ११. १९९६.

२] शासकीय अधिसूचना, वित्त विभाग क्रमांक - एमएसटी- १२९५/प्र. क्र. १०५/कराधान-३, दिनांक २२. ११. १९९६.

३] शासन पत्र, वित्त विभाग क्रमांक - एमएसटी-१२९५/ प्र. क्र. १०५/कराधान-३, दिनांक ७. २. १९९७.

४] शासन पत्र, वित्त विभाग क्रमांक - एमएसटी-१२९५/ प्र. क्र. १०५/कराधान-३, दिनांक २५. ७. १९९७.

प्रस्तावना :- राज्यातील मच्छीमार सहकारी सोसायट्यांना त्यांच्या मच्छीमार नौकांसाठी तेल कंपन्यांद्वारे पुरवठा केल्या जाणाऱ्या हायस्पीड डिझेलवर सवलतीच्या दराने विक्रीकर आकारला जात होता. परंतु हायस्पीड डिझेल खरेदी-विक्री व्यवहारामध्ये गैरव्यवहार होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आल्यामुळे त्याला प्रतिबंध घालण्यासाठी उपाय योजण्याचे ठरविले. मच्छीमार सहकारी सोसायट्यांना विकण्यात येणाऱ्या हायस्पीड डिझेलवरील विक्रीकर संपूर्ण माफ करण्याचा निर्णय घेऊन त्याबाबतची अधिसूचना दिनांक २२ नोव्हेंबर, १९९६ रोजी शासनाने प्रसिध्द केली. त्यानुसार मच्छीमार सहकारी सोसायट्यांची नावे, त्यांच्या यांत्रिकी नौकांची संख्या वगैरे बाबी निश्चित करुन त्यांना लागणाऱ्या हाय स्पीड डिझेलचा कोटा निश्चित करुन दिला.

ज्या सोसायट्यांची नावे उपरोक्त दिनांक २२ नोव्हेंबर, १९९६ च्या पत्रासोबतच्या यादीत समाविष्ट झाली नाहीत किंवा ज्यांना ठरवून दिलेला

[ कृ.मा.प. ]

हाय स्पीड डिझेलचा कोटा कमी पडतो अशा सोसायट्यांना हाय स्पीड डिझेल संपूर्ण विक्रीकर सवलतीने मिळेनासे झाले. त्यामुळे अशा सोसायट्या शासनाकडे विनंती वजा तक्रारी करु लागल्या. तसेच मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ खाली नोंदणीकृत मच्छीमार सहकारी सोसायट्यांना विक्रीकर माफीची सवलत देण्यात येते. त्यामध्येही दुरुपयोग किंवा कर चुकवेगिरी आढळून येते. अशा प्रकरणांमध्ये निर्णय घेण्यासाठी शासन स्तरावर विलंब होत असे. त्यामुळे संबंधित मच्छीमार सहकारी सोसायट्यांची अडचण होत असे. मच्छीमार सहकारी सोसायट्यांची अडचण होऊ नये, अशी प्रकरणे तात्काळ मार्गी लागावीत म्हणून निर्णय घेण्यासाठी शासनाने समिती नेमण्याचा निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :- राज्यातील मच्छीमार सहकारी सोसायट्यांना संपूर्ण विक्रीकर सवलतीने पुरविण्यात येणा-या हाय स्पीड डिझेलच्या कोट्यासंबंधी तसेच त्या अनुषंगाने येणा-या इतर बाबींसंबंधी तात्काळ निर्णय घेण्यासाठी शासन या निर्णयान्वये विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य आणि मत्स्यव्यवसाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांची एक समिती नियुक्त करीत आहे.

सदर समितीने मुख्यत: खालील बाबींवर प्राधान्याने कार्यवाही करुन परस्पर निर्णय द्यावयाचा आहे.

१] शासनाने निश्चित केलेल्या मच्छीमार सहकारी सोसायट्यांच्या यादीत एखाद्या सोसायटीचे नाव समाविष्ट करावयाचे राहून गेले असल्यास, अशा सोसायटीचे नाव यादीत समाविष्ट करावे किंवा एखाद्या सभासदाचे नाव सभासद म्हणून दोन किंवा त्यापेक्षा अधिक सोसायट्यांच्या यादीत समाविष्ट केले गेले असल्याचे निदर्शनास आल्यास अशा सभासदाचे नाव फक्त एकाच संस्थेच्या सभासदांच्या यादीत ठेऊन उर्वरित संस्थांच्या सभासदांच्या यादीतून वगळावे.

२] शासनाने निश्चित केलेल्या यादीतील एखाद्या सोसायटीचा डिझेलचा मंजूर कोटा चुकीच्या अगर अपु-या माहितीमुळे कमी अगर जास्त ठरविला गेला असेल तर अशा प्रकरणात आवश्यक ती संपूर्ण चौकशी करुन व खात्री करुन अशा संबंधीत संस्थेचा कोटा पुन्हा निश्चित करावा.

३] सवलतीच्या गैरवापराबाबतच्या तक्रारींच्या संदर्भात सर्वंकष चौकशी करुन योग्य तो निर्णय घ्यावा.

४] मच्छीमार सहकारी सोसायट्यांच्या सभासदांची यादी काटेकोरपणे तपासून निश्चित करावी.

५] मच्छीमार सहकारी सोसायट्यांना मंजूर केलेल्या विक्रीकर मुक्त डिझेलचा वापर योग्य कारणासाठीच केला जातो, त्यामध्ये गैरव्यवहार केला जात नाही याची खात्री करावी व गैरव्यवहार आढळून आल्यास किंवा गैरव्यवहार होत असल्याच्या तक्रारी आल्यास चौकशी करुन योग्य ती कार्यवाही तात्काळ करावी.

६] मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ खाली नोंदणीकृत मच्छीमार सहकारी संस्थांना मोनोफिलमेंट ट्वाईन, दोर, नायलॉनच्या धाग्यापासून बनविलेले फ्लोट इ. वस्तूंच्या विक्रीवर संपूर्ण विक्रीकर सवलत देण्यात येते तर बोटी, बोटीचे लाकूड, सागरी इंजिन्स आणि सागरी इंजिन्ससह त्याचे इतर आवश्यक ते सुटे भाग यांच्या विक्रीवर ४ टक्केहून जास्तीचा विक्रीकर माफ केला जातो व वेळोवेळी त्याकरीता दिलेल्या मुदतीमध्ये वाढही केली जाते. या सवलतीच्या विक्रीमध्ये होणारी कर चुकवेगिरी किंवा दुरुपयोग रोखण्यासाठी कोणती उपाययोजना करावी याबाबत शासनाकडे ४ महिन्याच्या कालावधीमध्ये शिफारस करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ ब. दि. उमाटे ]
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

प्रत माहितीकरीता अग्रेषित :-

१] अपर मुख्य सचिव [वित्त] यांचे स्वीय सहाय्यक

२] प्रधान सचिव [वित्त] यांचे स्वीय सहाय्यक

३] सचिव [पदुम], कृषि व पदुम विभाग, यांचे स्वीय सहाय्यक

४] विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, आठवा मजला, माझगांव, मुंबई - ४०० ०१०.

५] मत्स्यव्यवसाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, तारापोरवाला मत्स्यालय, चर्नीरोड, मुंबई - ४०० ००२.

६] निवड नस्ती, कराधान-३.